सन २०२३-२४ करीता महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनांतर्गत (MEMS) कार्यान्वित रुग्णवाहीकांवरील आवर्ती खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत. ( नोव्हेंबर २०२३ ते जानेवारी, २०२४ च्या ३० टक्के देयकाची रक्कम)

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः ईएमएस-२०२३/प्र.क्र.१३९ /आरोग्य -३
१० वा मजला , गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१
दिनांक: २७ मार्च, २०२४.

वाचा -

१) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०११/प्र.क. २२४ / आरोग्य-३, दिनांक २८ मार्च, २०१३.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/ प्र.क्र. ३८७/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक १५ जून, २०१६
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस- २०१८/प्र.क्र.२७०/ आरोग्य -३, दिनांक ०८ मे, २०१९.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस- २०१८/प्र.क्र.२७०/ आरोग्य -३, दिनांक २९जुलै, २०१९.
५) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०१८/ प्र.क्र.२७०/ आरोग्य -३ , दिनांक ०४ जानेवारी, २०२०.
६) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस- २०१९/ प्र.क्र.१७७/ आरोग्य -३, दिनांक १७ मार्च, २०२०, ७ जुलै,२०२० व १६ ऑक्टोबर, २०२०
७) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०२१/प्र.क.९६/आरोग्य-३, दिनांक २५ मे, २०२१.
८) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक समिती-२०२३/प्र.क्र.१५२/आरोग्य-३, दिनांक २९ जानेवारी, २०२४
९) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्रमांकः आसेआ / कक्ष-३ / नस्ती क्र.२२/टे-४/MEMS-१०८/नोव्हे२३ ते जाने २४ ३०% देयक/७४३४-३५/२०२४, दि.१९.०३.२०२४

प्रस्तावना :-

राज्यात आपदग्रस्तास तातडीने वैद्यकीय मदत मिळावी याकरीता अत्याधुनिक दळणवळण यंत्रणेसह वैद्यकीय उपकरणांनी सुसज्ज अशा रुग्णवाहिकांची सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या माध्यमातून संपुर्ण राज्यात २३३ ॲडव्हान्स लाईफ सपोर्टींग (ALS) आणि ७०४ बेसिक

लाईफ सपोर्टींग (BLS) अशा एकूण ९३७ रुग्णवाहिकांची आपत्कालिन प्रतिसाद सेवा (EMS) ५ वर्षाकरीता राबविण्यासाठी मे.बी.व्ही.जी.इंडीया या सेवा पुरवठादाराशी करार करुन दिनांक २६ जानेवारी, २०१४ पासून कार्यान्वित करण्यात आली. तद्नंतर उपरोक्त अ. क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ पासून सदर योजना राष्ट्रीय आरोग्य अभियानाकडून संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात आली. यास्तव सन २०१६-१७ पासून सदर योजना राज्य योजना म्हणून कार्यान्वित आहे. सदर योजनेबाबत सेवापुरवठादाराशी केलेल्या करारपत्रानुसार सदर कराराची मुदत दिनांक ३१ जानेवारी, २०१९ रोजी संपुष्टात आली. तथापि, रूग्णसेवेमध्ये अडचणी न येता रूग्णवाहिका सेवा विनाखंड सुरू राहण्यासाठी तातडीची बाब म्हणून दिनांक ०१ फेब्रुवारी,२०१९ ते ३१ जानेवारी, २०२१ या कालावधीत अनु.क्र.३ ते ६ अन्वये विविध आदेशान्वये तात्पुरती मुदतवाढ देण्यात आली. त्यानंतर वरील अनुक्रमांक ७ अन्वये अ.मु.स.(वित्त) यांच्या अध्यक्षतेखालील समितीच्या शिफारशीनुसार व मा. राज्यपाल महोदयांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने मा.मंत्रिमंडळाने दिलेल्या अंतिम निर्णयानुसार जुन्या पुरवठादारास अटींच्या अधीन राहून सदर करारास दि.०१.०२.२०१९ ते दि.३१.०१.२०२४ पर्यंत या कालावधीकरीता अंतिम मुदतवाढ दिली आहे. तसेच सद्यस्थितीत सदर मुदतवाढ संपुष्टात आली असून संदर्भाधीन अनुक्रमांक ८ अन्वये मे.बीव्हीजी इंडिया लि. या सेवा पुरवठादारासोबत केलेल्या करारास तात्पुरत्या स्वरुपात सध्याच्याच अटी व शर्तीवर पुढील तीन महिने म्हणजे (दिनांक ०१.०२.२०२४ ते दिनांक ३०.०४.२०२४) या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर योजनेवरील नोव्हेंबर,२०२३ ते जानेवारी, २०२४ च्या देयकामधील ३० टक्के रकमेच्या आवर्ती खर्चाचा प्रस्ताव आयुक्तालयाकडून सादर करण्यात आला आहे. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजना अंतर्गत कार्यान्वित असलेल्या टोल फ्री क्रमांक १०८ च्या सुसज्ज रुग्णवाहीकांवरील सेवा पुरवठादारास दि.०१.०२.२०१९ ते दि.३१.०१.२०२४ या ५ वर्षाकरीता मुदतवाढ देण्यात आली होती. सद्य:स्थितीत सदर मुदतवाढ संपुष्टात आली असून संदर्भाधीन अनुक्रमांक ८ अन्वये मे.बीव्हीजी इंडिया लि. या सेवा पुरवठादारासोबत केलेल्या करारास तात्पुरत्या स्वरुपात सध्याच्याच अटी व शर्तीवर पुढील तीन महिने म्हणजे (दिनांक ०१.०२.२०२४ ते दिनांक ३०.०४.२०२४) या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. आयुक्तालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार माहे नोव्हेंबर, २०२३ ते माहे जानेवारी, २०२४ च्या ७०% देयकास मान्यता देण्यात आली आहे. सदर कालावधीतील मूळ देयकाच्या

उर्वरीत ३० टक्के रु.३०,२४,१२,४११/- (रु.तीस कोटी चोविस लाख बारा हजार चारशे अकरा फक्त) इतक्या रकमेच्या देयकास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर देयकांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | महिना | मूळ देयकाची रक्कम | मूळ देयकाच्या ७० टक्के नुसार अदा केलेली रक्कम | मूळ देयकाच्या उर्वरित ३० टक्के देय रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | नोव्हेंबर,२०२३ | ३३,६१,८०,५७७/- | २३,५३,२६,४०४/- | १०,०८,५४,१७३/- |
| २ | डिसेंबर,२०२३ | ३३,६१,३५,६०१/- | २३,५२,९४,९२१/- | १०,०८,४०,६८०/- |
| ३ | जानेवारी, २०२४ | ३३,५७,२५,१९५/- | २३,५०,०७,६३७/- | १०,०७,१७,५५८/- |
| | | | **एकूण** | **३०,२४,१२,४११/-** |

३. उपरोक्त रुग्णवाहीकांमार्फत पुरविण्यात आलेल्या सेवांचा तपशिल दरमहा शासनास सादर करण्यात यावा. करारानुसार मूळ देयकातील उर्वरीत ३० टक्के रक्कम अदा करतांना माहे नोव्हेंबर,२०२३ ते माहे जानेवारी, २०२४ या कालावधीतील रु.८४,२४,१९८/-(अक्षरी रुपये चौऱ्याऐंशी लाख चोवीस हजार एकशे अठ्ठ्याण्णव फक्त) इतकी दंडात्मक रक्कम वजाती करुन घेण्यात यावी.

४. या बाबीवरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, ०१ किमान गरजा कार्यक्रम (०१) (१०) - ट्रॉमा केअर युनिटची स्थापना - महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा, (२२१०४६८९) - १३ - कार्यालयीन खर्च या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उपविभाग-४ मधील अ.क्र. ११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरचा प्रस्ताव आयुक्त (आरोग्य सेवा) यांच्या मान्यतेने आल्यामुळे, सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये) यांनी देयक अदा करण्यासाठी कोषागारात त्वरीत सादर करावे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१७४४२८१७१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivdas Mahadeo Dhule

Digitally signed by Shivdas Mahadeo Dhule
DN: cn=Shivdas Mahadeo Dhule, o, ou, email=shivdas.dhule@nic.in, c=US
Date: 2024.03.27 12:19:37 +05'30'

**(शि. म. धुळे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा),महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
५. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
६. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा/लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (आरोग्य -३)